माजी परिविक्षाधीन व मुक्तबंदी यांना त्यांचे पुनर्वसनासाठी आर्थिक सहाय्य मंजूर करणेबाबत.

महाराष्ट्र शासन
गृह विभाग.

शासन निर्णय, क्रमांक : पीओए-१०९२/५ [२२६] / प्रीआरएस-२,
मंत्रालय, मुंबई -४०० ०३२, दिनांक : १५ जुन, १९९३.

वाचा. :- १] शासन निर्णय, गृह विभाग, क्र. पीओए-०२७२/१[२६]/जे, दिनांक : ३ ऑगस्ट, १९७७.

२] संचालक, सुधारसेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्र. संसुसे/अनुदान/९२-९३/पीओए-२, दिनांक २३. १२. १९९२.

शासन निर्णय :- शासन निर्णय, गृह विभाग, क्र. पीओए-०२७२/१[२६]/जे, दिनांक ३ ऑगस्ट, १९७७ अन्वये संचालक, सुधारसेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना माजी परिविक्षाधीन व मुक्तबंदी यांच्या पुनर्वसनासाठी रु. ५००/- पर्यंत आर्थिक सहाय्य मंजूर करण्याचे अधिकार आहेत. त्यापुढील अधिकार शासनास असल्याने परिविक्षाधीन श्री. भगवान यशवंत गोरड यांना शेळी खरेदी करण्यासाठी रु. १०००/- [रुपये एक हजार फक्त] एवढे आर्थिक सहाय्य मंजूर करण्यास शासन या आदेशाद्वारे मंजूरी देत आहे.

२. ह्यासाठी होणारा खर्च "२२३५-सामाजिक सुरक्षा व कल्याण-१०६-सुधारसेवा-१०६ [एक] सराईत अपराधी व अपराधीन परिविक्षा योजना -४१, सहाय्यक अनुदान/अंशदान/अर्थसहाय्य" ह्या शिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व तो १९९३-९४ च्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

३. हा आदेश वित्त विभागाच्या सहमतीने व त्या विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र. सीआर-३००/९३/व्यय-८, दि. २६. ५. १९९३ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

अपाटील
[ अ. ल. पाटील ]
अवर सचिव, महाराष्ट्र शासन, गृह विभाग.

...२/-